**पणन हंगाम २०१७-१८ मध्ये धान / तांदूळ / भरडधान्य साठवणूकीसाठी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची तसेच कृषी उत्पन्न बाजार समितीची गोदामे भाडेतत्वावर घेणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांकः गोदाम-२०१७/प्र.क्र. १९८ /नापु-२९**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२

दिनांक: ०५ जून २०१८

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः खरेदी-१०१४/ प्र.क्र.१७/ नापू-२९, दिनांक १४.०१.२०१६**
२) **शासन निर्णय क्रमांकः खरेदी १०१७/प्र.क्र.१४० /नापु-२९, दिनांक ०४.१०.२०१७**
३) **शासन शुद्धिपत्रक क्रमांकः खरेदी १०१७/प्र.क्र.१४० /नापु-२९, दिनांक ०५.१०.२०१७**
४) **शासन शुद्धिपत्रक क्रमांकः खरेदी १०१७/प्र.क्र.१४० /नापु-२९, दिनांक १०.१०.२०१७**

**प्रस्तावना -**

खरीप व रब्बी पणन हंगाम २०१७-१८ या दोन्ही हंगामापासून केंद्र शासनाच्या निर्देशानुसार संपूर्ण राज्यात "विकेंद्रित खरेदी योजना" (Decentralized Procurement Scheme) राबविण्याचा निर्णय शासनाने संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार सदर योजनेची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्यात येत आहे. यापूर्वी भारतीय अन्न महामंडळामार्फत किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेतंर्गत धानाची भरडाई करून तयार होणारा तांदूळ त्यांच्या अखत्यारीतील गोदामांत जमा केला जात होता. तथापि पणन हंगाम २०१६-१७ पासून विकेंद्रित खरेदी योजनेंतर्गत तयार होणारा तांदूळ राज्य शासनाच्या गोदामात जमा करून लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत वितरीत करावयाचा आहे. त्यासाठी अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाकडे साठवणूकीची पुरेशी यंत्रणा उपलब्ध नसल्यामुळे शासनाच्या इतर विभागाची व महामंडळाची या कामासाठी मदत घेणे आवश्यक आहे. महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील शासनाचा सार्वजनिक उपक्रम असून या सार्वजनिक उपक्रमामार्फत अन्नधान्य साठवणूकीसाठी राज्यात बहुतांश ठिकाणी गोदामांची बांधकामे करण्यात आलेली आहेत. यापूर्वी भारतीय अन्न महामंडळामार्फत खरेदी होत असतांना, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची गोदामे भाडयाने घेतली जात होती. तरी सदर बाब विचारात घेऊन राज्य शासनाकडून खरेदी केलेला तांदूळ किंवा इतर धान्यसाठा साठवणूकीसाठी भारतीय अन्न महामंडळ आणि महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यापैकी जे दर कमी असतील त्या दराने व कृषी उत्पन्न बाजार समिती आणि भारतीय अन्न महामंडळ यांपैकी जे दर कमी असतील त्या दराने, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची तसेच पणन विभागाच्या अखत्यारितील कृषी उत्पन्न बाजार

समित्यांची गोदामे भाडेतत्वावर घेण्याची बाबदेखील शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

हंगाम २०१७-१८ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेतंर्गत राज्यात विविध ठिकाणी खरेदी करण्यात आलेले धान व त्याची भरडाई करुन प्राप्त होणारा तांदूळ व भरडधान्य( ज्वारी, बाजरी व मका ) साठवणूकीसाठी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाची गोदामे भारतीय अन्न महामंडळ आणि महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ यापैकी जे दर कमी असतील त्या दराने व कृषी उत्पन्न बाजार समिती आणि भारतीय अन्न महामंडळ यांपैकी जे दर कमी असतील त्या दराने खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून भाडेतत्वावर घेण्यात यावीत.

१. संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाकडे तसेच कृषी उत्पन्न बाजार समिती कडे किमान १५०० मे.टन इतक्या क्षमतेचे धान साठवणुकीसाठी गोदाम (सर्व सोयीयुक्त) उपलब्ध असल्याबाबत खातरजमा करावी. सदरची खातरजमा झाल्यानंतर उपलब्ध गोदामासाठी त्यांच्याकडे आरक्षण प्रस्ताव सादर करावा.

२. भाडेतत्वावर घेतलेल्या सदर गोदामातील साठयाच्या विमा, किड प्रतिबंधात्मक उपाययोजना, सुरक्षा, आवक-जावकच्या नोंदी ठेवणे इ.बाबतची संपूर्ण जबाबदारी त्या संस्थांची राहील.

३. भाडेतत्वावर घेतलेल्या गोदामामध्ये माल साठवणूक करण्यापूर्वी मालाची गुणवत्ता विभागाने नियुक्त केलेल्या गुणवत्ता नियंत्रकाकडून (Q.C.) प्रमाणित करण्यात येईल व त्याबाबतचे प्रमाणपत्र सदर संस्स्थेस देण्यात येईल.

४. गुणवत्ता नियंत्रकाकडून (Q.C.) धान्य स्वीकृत झाल्यानंतर, गोदामामध्ये धान्य स्विकारताना सदर धान्याचे प्रत्यक्ष वजन करुन विहित आर्द्रतेची खात्री करुन तपासाअंती गोदाम प्रमुख व जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रतिनिधी यांच्या संयुक्त स्वाक्षरीने नोंद केली जाईल. सदरच्या नोंदी त्यापुढील सर्व प्रयोजनांसाठी ग्राहय धरण्यात येतील.

५. राज्य शासनाकडून खरेदी करण्यात आलेल्या धान/त्यापासून प्राप्त झालेला तांदूळ किंवा भरडधान्य इत्यादींची साठवणूकीसाठी गोदामात आवक झाल्यानंतर गोदाम मालक संस्थेच्या गोदामपालाकडून संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे आवकीच्या दिनांकापासून ४८ तासांत आवकीचा तपशील सादर करणे बंधनकारक राहील. तसेच त्याची नोंद संगणकीय प्रणालीवर करणे बंधनकारक राहील.

६. साठवणूक केलेल्या धान्याची जावक देताना सदर धान्याचे प्रत्यक्ष वजन करुन विहित आर्द्रतेची खात्री करुन त्याची जिल्हा पुरवठा अधिकारी यांचे प्रतिनिधी व गोदाम मालक संस्थेचे संबंधीत केंद्र प्रमुख यांच्या संयुक्त स्वांक्षरीने नोंद करण्यात येईल.

७. राज्य शासनाकडून साठवणूक करण्यात आलेल्या तांदूळ किंवा अन्नधान्य साठवणूकीसाठी धान्याची जावक झाल्यानंतर गोदाममालक संस्थेच्या संबंधीत केंद्र प्रमुख यांच्याकडून संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे जावकीच्या दिनांकापासून तपशील ४८ तासांत सादर करणे बंधनकारक राहील. तसेच जावकीची नोंददेखील संगणकीय प्रणालीवर करणे बंधनकारक राहील.

८. राज्य शासनाकडून खरेदी करण्यात आलेल्या तांदूळ किंवा इतर धान्याच्या साठवणूकीच्या आरक्षणापोटी झालेल्या आवक व जावकची माहिती गोदाम मालक संस्थेच्या संबंधित केंद्र प्रमुख यांच्याकडून संबंधीत जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करणे आवश्यक राहील.

९. धान / तांदूळ / भरडधान्य यांच्या साठवणूकीसाठी आरक्षित केलेल्या गोदामांच्या भाडयाची रक्कम विहित केलेल्या दरानुसार गोदाम मालक संस्थेस अदा केली जाईल.

१०. गोदाम मालक संस्थेस गोदाम भाडयाच्या देय रकमा दरमहा शासन स्तरावरुन अदा केल्या जातील. या रकमा केंद्र शासनाकडून प्राप्त झाल्यानंतर त्या वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा, मुंबई या कार्यालयामार्फत गोदाम मालक संस्थेस अदा करण्यात येतील.

११. केंद्रीय वखार अधिनियम, १९६२ व महाराष्ट्र वखार अधिनियमातील तरतूदींनुसार महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ राज्यभर केवळ साठवणूकीचे व्यवस्थापन करीत असल्याने अन्नधान्य वितरण व्यवस्थेसाठी निश्चित केलेले मॅन्युअल्सचा वापर करणे महामंडळावर बंधनकारक नाही. तसेच, महामंडळाची स्वत:ची व्यवस्थापन कार्यपध्दती निश्चित असल्याने विभागाचे विविध मॅन्युअलस् मध्ये दिलेले निर्देश महामंडळावर बंधनकारक राहणार नाहीत.

१२. जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्यामार्फत हाताळणी व वाहतूक कामी शक्य असेल तेथे ठेकेदाराची नियुक्ती करण्यात यावी. ज्या ठिकाणी जिल्हा पुरवठा अधिकारी हाताळणी व वाहतूक कामाची व्यवस्था करु शकत नाही, त्या ठिकाणी गोदाम मालक संस्थेने भारतीय अन्न महामंडळाच्या कामासाठी ज्या प्रमाणे हाताळणी व वाहतूक ठेकेदार नियुक्त केले जातात, त्याप्रमाणे ठेकेदार नियुक्त करण्यात यावेत. अशा प्रकरणी केंद्र शासनाच्या Cost Sheet प्रमाणे गोदाम मालक संस्थेस सदर खर्च अनुज्ञेय राहील. अशा प्रकरणात शासनाकडून या रकमा प्राप्त झाल्यानंतर त्या गोदाम मालक संस्थेमार्फत संबंधित ठेकेदारांना अदा केली जाईल.

१३. खरेदी केलेल्या धान/तांदूळ/ भरडधान्य साठयामध्ये हाताळणी व वाहतूक किंवा आर्द्रता कमी होणे आणि इतर नैसर्गिक व अनुषंगिक कारणास्तव तूट संभवते. अशा प्रकारच्या तुटीची प्रकरणे निर्लेखित करण्याबाबत भारतीय अन्न महामंडळाच्या पत्र क्र.STK/RL/MOSC/N२/११/VOL III/५८१ दि.१२.१२.२०१२ अन्वये विहित करण्यात आलेल्या तरतूदी लागू राहतील. तदनंतर सदरहू पत्रातील तरतूदींमध्ये बदल झाल्यास त्यानुसार सुधारित बदल जसेच्या तसे लागू होतील.

१४. गोदाम मालक संस्थेच्या संबंधित केंद्र प्रमुखांकडून संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्याकडे साठवणूक तूटीची प्रकरणे निर्लेखनासाठी प्रत्येक महिन्याच्या ७ तारखेपर्यंत अथवा त्या दिवशी सार्वजनिक सुट्टी असल्यास कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी सादर करणे बंधनकारक राहिल.

१५. वरील अट क्र.१३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे ज्या प्रकरणी भारतीय अन्न महामंडळाच्या निदेशानुसार तूट निर्लेखित केली जाऊ शकते अशा प्रकरणी जिल्हा पुरवठा अधिकारी यांच्या स्तरावर ३ महिन्यांच्या आत निर्लेखनाची कार्यवाही करण्यात यावी.

१६. तूट निर्लेखनाची सर्व प्रकरणे निकाली काढण्यासाठी अधिकतम १ वर्षाचे बंधन असेल. जर अशा प्रकरणात १ वर्षाच्या आत निर्णय घेण्यात आला नाही, सदर तूट प्रकरणी तूट आली नाही, असे समजून महाराष्ट्र राज्य वखार महामंडळास रकमा अदा केल्या जातील आणि विलंबास जबाबदार असलेल्या संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करुन कायदेशीर कारवाई प्रस्तावित करण्यात येईल.

१७. अन्नधान्य वितरण व्यवस्थेतील तुटीच्या प्रकरणांसाठी किंवा तूट पोटीच्या निर्लेखनासाठी शासनाने निर्गमित केलेले आदेश गोदाम मालक संस्थेस साठवणूकीसाठी ठेवलेल्या इतर अन्नधान्याच्या साठयासाठी लागू राहणार नाहीत.

१८. राज्य शासनाकडून खरेदी केल्या जाणाऱ्या धान/तांदूळ/ भरडधान्याच्या महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाच्या गोदामांतील साठवणूकीबाबत सदर सर्व अटींचा अंतर्भाव असलेला करारनामा राज्य शासनाच्या वतीने प्रधान सचिव ( अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग ) अथवा त्यांनी प्राधिकृत केलेला अधिकारी व गोदाम मालक संस्थेच्या वतीने अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, गोदाम मालक संस्था यांच्या अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याच्या स्वाक्षरीने करण्यात येईल. सदरचा काररनामा संपुष्टात आणण्यासाठी राज्य शासन किंवा गोदाम मालक संस्था यांनी ३ महिन्याची पूर्व सूचना (नोटीस) देणे संबंधितांवर बंधनकारक राहील.

१९. वरील शासन निर्णयानुसार हंगाम २०१७-१८ या हंगामातील धान्याच्या साठवणुकीकरिता गोदाम भाडयापोटी गोदाम मालक संस्थेस देय रक्कम विभागाचे वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचे स्तरावरुन वेळचे वेळी अदा केल्या जातील. सदरचा खर्च "मागणी क.एम्-४, ४४०८- अन्न साठवण व वखार साठवण यांवरील भांडवली खर्च, ०१-अन्न १०१ प्रापण व पुरवठा ०२-प्रापण वितरण व किंमत नियंत्रण (०२) (०६) मुफसल अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (४४०८ ०२७३) ५०- इतर खर्च "या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०५१२०७२०८५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2018.06.05 12:07:20 +05'30'

**(सतिश सुपे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.मंत्री (अनापुवग्रासं.) यांचे खाजगी सचिव,
४. मा.राज्यमंत्री (अनापुवग्रासं) यांचे खाजगी सचिव,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद/विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. सर्व मा.विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य,
७. मा.मुख्य सचिव,
८. सर्व अप्पर मुख्य सचिव/सर्व प्रधान सचिव/सचिव,
९. अप्पर मुख्य सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग,
१०.प्रधान सचिव, (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.)
११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि., मुंबई.
१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.
१३.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे.
१४.वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५.सर्व जिल्हाधिकारी/सर्व विभागीय आयुक्त
१६.सर्व उप आयुक्त (पुरवठा)
१७.सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी/सर्व अन्नधान वितरण अधिकारी.
१८. निवडनस्ती (नापु-२९)